**पवित्र (PAVITRA - Pavitra for Visible To All Teacher Recruitment) या संगणकीय प्रणालीद्वारे राज्यातील सर्व व्यवस्थापनांच्या (अल्पसंख्यांक संस्था वगळून) शाळांमधील शिक्षक निवडीसाठी पारदर्शक पध्दती विहीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. सीईटी-२०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० जून, २०१८

**वाचा :-** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.सीईटी-२०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१, दिनांक १२ जून, २०१७.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.सीईटी-२०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१, दिनांक २३ जून, २०१७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७ / प्र.क्र.९४/ अर्थ-३, दि.८ ऑगस्ट, २०१७.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.न्यायाप्र-२०११/(३९७/११)/माशि-२, दिनांक ०९ नोव्हेंबर, २०११.
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.एसएसएन-१००७/(३६/०७)/माशि-२, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१२.
६) शासन शुध्दीपत्रक शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.एसएसएन-२०१७/(२०/१७)/ टीएनटी-२, दिनांक २३ ऑगस्ट, २०१७.
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.एसएसएन-२०१७/(९३/१७)/ टीएनटी-२, दिनांक १३ मार्च, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विविध व्यवस्थापनाच्या अनुदानित, अंशत: अनुदानित, अनुदानास पात्र घोषित केलेल्या विनाअनुदानित प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक विद्यालयांमधील शिक्षण सेवक भरती प्रक्रिया ही अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी मधील गुणांच्या आधारे करण्याचा निर्णय संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयाद्वारे घेतला आहे.

अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी तसेच शिक्षण सेवक निवड प्रक्रिया ही संगणकीय प्रणालीच्या आधारे करण्यात येणार असून शिक्षण सेवक निवड प्रक्रिया राबविण्यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयाद्वारे विहीत प्रक्रिया राबवून संगणक एजन्सी निश्चित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला.

पवित्र (PAVITRA - Pavitra for Visible To All Teacher Recruitment) या संगणकीय प्रणालीद्वारे शिक्षण सेवक निवड प्रक्रियेसाठी संगणक एजन्सी निश्चित करणे व याबाबतची कार्यपध्दती विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थासह खाजगी व्यवस्थापनाच्या ( अल्पसंख्यांक संस्था वगळून ) अनुदानित, अंशत: अनुदानित, अनुदानास पात्र विनाअनुदानित शाळा व विनाअनुदानित शाळामधील शिक्षण सेवक/ शिक्षक निवडीकरीता सद्यस्थितीत अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीसाठी नियुक्त केलेल्या यंत्रणेद्वारे दि.१२.१२.२०१७ ते २१.१२.२०१७ या कालावधीत चाचणी घेण्यात आलेली आहे. या पुढील चाचणी करीता शासन निर्णय दि.२३.६.२०१७ मधील तरतूदीनुसार परीक्षा यंत्रणेची नियुक्ती वेळोवेळी करण्यात येईल. अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी संदर्भात शालेय शिक्षण व क्रीडा विभागाशी संबंधित कार्यवाही महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे या कार्यालयामार्फत करण्यात येईल. सदर चाचणीमध्ये प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे शिक्षण सेवक नियुक्तीची कार्यवाही करण्यात येणार आहे. याकरीता राज्यस्तरावर आयुक्त (शिक्षण) यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत असलेल्या ई-गव्हर्नन्स सेलद्वारे राष्ट्रीय सूचना केंद्रामार्फत "पवित्र" ही संगणकीय प्रणाली विकसित करण्यात आली आहे.

२) शिक्षण सेवक भरती प्रक्रिया वर्षातून २ वेळा आवश्यकतेनुसार करण्यात येईल. शिक्षण सेवक निवडीसाठी "पवित्र" संगणकीय प्रणालीद्वारे अनुसरावयाची कार्यपध्दती खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहे :-

१. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांसह प्रत्येक खाजगी शैक्षणिक संस्थेस ("यापुढे शैक्षणिक संस्था") तसेच संबंधित प्राधिकाऱ्यांना परिशिष्ट - अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे स्वतंत्र Log in (User name, Password) दिला जाईल.

त्याचप्रमाणे अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीमध्ये गुण प्राप्त केलेल्या उमेदवारांना त्यांच्या User name / Password वर Log in ची सुविधा दिली जाईल.

२. सन २०१६-१७ च्या समायोजनानंतर पुढील प्रत्येक वर्षाच्या समायोजनाअंती रिक्त असलेल्या पदांची व आरक्षणाची माहिती "सरल" द्वारे शैक्षणिक संस्थांना त्यांच्या "पवित्र" संगणकीय प्रणालीवरील Log in वर उपलब्ध होईल.

३. खाजगी शैक्षणिक संस्था, जिल्हा परिषद, महानगरपालिका, नगरपालिका, नगर परिषद हे दरवर्षाच्या एक जानेवारी व एक ऑक्टोबर रोजी रिक्त असलेल्या पदांनुसार त्यांची बिंदूनामावलीची नोंद "सरल" प्रणालीवर अद्ययावत (update) करतील. त्यासाठीची माहिती भरणारी व तपासणी करणारी यंत्रणा परिशिष्ट-'अ' नमूद केल्याप्रमाणे राहील. प्रत्येक पद भरती करतेवेळी बिंदूनामावली तपासणे आवश्यक राहील. अन्यथा, प्रचलित कार्यपध्दतीनुसार बिंदुनामावली तपासणे आवश्यक आहे. आदिवासी क्षेत्रातील शाळांमध्ये शिक्षण सेवक पद भरतीकरिता PESA (The Panchayat Extension To Scheduled Area Act 1996) व महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग ४ दि. ०९ जून २०१४ ची अधिसूचना यातील तरतूदी लागू राहतील.

४. शैक्षणिक संस्था, त्यांच्या शाळांमधील शिक्षण सेवकांची रिक्त पदे माहे मे, मधील भरतीकरिता, माहे मार्च, अखेर रिक्त असणारी पदे व माहे सप्टेंबर, अखेर रिक्त होणारी संभाव्य पदे यांची संख्या तसेच माहे नोव्हेंबर मधील भरतीकरिता, माहे ऑक्टोबर अखेर रिक्त होणारी पदे व माहे जानेवारी अखेर रिक्त होणारी संभाव्य पदे यांची संख्या विचारात घेवून संच मान्यतेतील गटनिहाय व विषयनिहाय रिक्त पदांची माहिती किमान शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता व बिंदूनामावलीनुसार समांतर आरक्षणाची पदे यासह "पवित्र" प्रणालीवर भरेल. त्यानुसार शिक्षणाधिकारी (प्राथमिक) / शिक्षणाधिकारी (माध्यमिक) अथवा विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्याकडे प्रकरणपरत्वे जाहिरात परवानगीचा प्रस्ताव त्या-त्या वर्षाच्या माहे एप्रिलच्या पहिल्या आठवड्यात / माहे ऑक्टोबर च्या पहिल्या आठवड्यात सादर (Forward ) करेल. बिंदूनामावली / जाहिरातीस पूर्व परवानगी याकरिता संबंधित शैक्षणिक संस्था तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांनी करावयाची कार्यवाही याबाबतचे वेळापत्रक वेळोवेळी निश्चित करण्यात येईल.

५. शिक्षणाधिकारी (प्राथमिक)/शिक्षणाधिकारी (माध्यमिक), प्रशासन अधिकारी, मनपा / नपा अथवा विभागीय शिक्षण उपसंचालक यांना त्यांच्या Log in वर माहिती प्राप्त झाल्यानंतर ते संस्थेने भरलेल्या रिक्त पदांचा, विषयांचा तसेच बिंदूनामावलीनुसार आरक्षण व समांतर आरक्षण याचा तपशील बरोबर असल्याची खात्री करतील व सदरची माहिती बरोबर असल्यास मान्य करतील. माहिती अपूर्ण अथवा चुकीची असल्यास शिक्षणाधिकारी (प्राथमिक ), शिक्षणाधिकारी (माध्यमिक), प्रशासन अधिकारी, मनपा / नपा अथवा विभागीय शिक्षण उपसंचालक जाहिरात परवानगीचा प्रस्ताव त्याबाबतच्या कारणासह अमान्य करतील.

६. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), प्रशासन अधिकारी अथवा विभागीय उपसंचालक यांनी ७ (सात) कार्यालयीन दिवसाच्या विहित कालमर्यादेत प्रस्तावावर कार्यवाही न केल्यास त्याबाबतची सद्यस्थिती थेट संबंधित शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांच्या Log in वर दर्शविली जाईल. संबंधित शिक्षण संचालक ( प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक ), त्यांच्या Log in वर प्राप्त झालेल्या सद्यस्थितीबाबत संबंधित शिक्षणाधिकारी / प्रशासन अधिकारी अथवा विभागीय उपसंचालक यांनी पुढील ३ ( तीन ) कार्यालयीन दिवसांच्या आत मान्यता (Approval) देण्याबाबत, सूचना देण्यात येतील.

शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक ), प्रशासन अधिकारी अथवा विभागीय उपसंचालक यांनी विहीत मुदतीत जाहिरात परवानगी प्रस्तावावर निर्णय न घेतल्यास संबंधित अधिकाऱ्यास शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांच्या समक्ष जाहिरातीच्या प्रस्तावासह उपस्थित राहून निर्णय घेणे बंधनकारक असेल. संबधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात कर्तव्य कसूरीबाबत नोंद घेण्याच्या सूचना शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक) संबंधित वरिष्ठ प्राधिकाऱ्यास देतील.

७. शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक ), प्रशासन अधिकारी अथवा विभागीय उपसंचालक यांनी मान्यता दिल्यानंतर संस्थेच्या मागणीनुसार "पवित्र" पोर्टलवर जाहिरात प्रदर्शित होईल व संस्थेच्या Log in वर दिसेल. तसेच संस्थेच्या प्रतिनिधीस त्याबाबत SMS द्वारे संदेश प्राप्त होईल व सदर जाहिरात www.education.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रदर्शित होईल.

८. जाहिरात वेबसाईटवर प्रदर्शित झाल्यावर जास्तीत जास्त ३ कार्यालयीन दिवसांत संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णयातील तरतूदीनुसार संबंधित संस्थेने त्यास दोन अधिक खपाच्या स्थानिक व विभागस्तरीय वृत्तपत्रातून प्रसिध्दी द्यावयाची आहे. संस्थेच्या शाळा महसूल विभागाबाहेर असल्यास राज्यस्तरीय वृत्तपत्रामध्ये जाहिरात प्रसिध्द करावी. अशी प्रसिध्दी दिल्याची नोंद "पवित्र" प्रणालीमध्ये संबंधित संस्थेने करावी.

९. जाहिरातीनुसार पात्र उमेदवार "पवित्र" संगणक प्रणालीवर आपला अर्ज अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीमधील प्राप्त गुणांसह ऑनलाईन भरेल. तसेच शाळा आस्थापना / शैक्षणिक संस्था निवडीबाबत प्राधान्यक्रम निश्चित करेल.

१०. विविध सेवायोजन कार्यालयात नोंदणी केलेल्या उमेदवारांनी देखील "पवित्र" पोर्टलवर Online अर्ज करणे आवश्यक आहे.

११. उमेदवार अर्जामध्ये प्रवर्ग व विषय यांचा विचार करुन जास्तीत जास्त २० प्राधान्यक्रम देऊ शकतील. सदर प्राधान्यक्रम संपल्यानंतर जाहिरातीमध्ये नमूद केलेल्या जागा रिक्त असल्याचे निदर्शनास आल्यास पुन:श्च विकल्प घेऊन नव्याने निवड प्रक्रिया राबविली जाईल.

१२. जाहिरातीचा कालावधी संपल्यानंतर पाच कार्यालयीन दिवसाच्या आत शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ) "पवित्र" संगणक आज्ञावलीद्वारे उमेदवारांची निवडसूची www.education.maharashtra.gov.in संकेतस्थळावर जाहिर करतील.

१३. संबधित संस्थेसदेखील गुणानुक्रमानुसार माध्यम, प्रवर्ग, विषय व बिंदूनामावलीनुसार उमेदवारांची निवडसूची त्यांच्या Login वर प्राप्त होईल.

१४. निवड सूचीवरील उमेदवारास ज्या शाळेमध्ये शिक्षण सेवक म्हणून संबंधित शैक्षणिक संस्थेला नियुक्ती द्यावयाची आहे, त्या शाळेच्या Log in वर संबंधित उमेदवाराची माहिती उपलब्ध होईल. या प्रक्रियेद्वारे संबंधित उमेदवाराची स्विकृती / रुजू होण्यापूर्वी त्याच्या आवश्यक सर्व मूळ कागदपत्रांची ( शालान्त / उच्च माध्यमिक अभ्यासक्रमाची गुणपत्रिका व प्रमाणपत्र, मान्यताप्राप्त विद्यापिठाची शैक्षणिक व व्यावसायिक अभ्यासक्रम पूर्ततेची पदवी / पदविका, शाळा सोडल्याचा दाखला, जातीचे प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र (मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांकरिता), अधिवास प्रमाणपत्र, शिक्षक पात्रता परीक्षा / अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षेमध्ये मिळालेले गुण तसेच समांतर आरक्षण (महिला / दिव्यांग / खेळाडू इत्यादी) करीता त्या-त्या प्रवर्गात आवश्यक असलेले कागदपत्र याबाबतची छाननी ही संबंधित नियुक्ती प्राधिकारी ३ (तीन) कार्यालयीन दिवसांत करतील.

नियुक्तीकरिता उमदेवाराने सादर केलेले कागदपत्र खोटे अथवा बनावट असल्याचे त्याच्या सेवेच्या कालावधीत कोणत्याही वेळी निदर्शनास आल्यास, संबंधित उमेदवार फौजदारीस पात्र असेल व त्याच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

१५. छाननीअंती निवडसूचीवरील संबंधित उमेदवार आवश्यक अर्हता धारण करीत नसल्यास, नियुक्ती प्राधिकारी तशी नोंद Online पध्दतीने वरील नमूद कालावधीत करेल. त्यानुसार उमेदवारास प्रणालीद्वारे माहिती प्राप्त होईल. यासंदर्भात उमेदवारास आक्षेप असल्यास सात दिवसांच्या आत "पवित्र" प्रणालीवर तो आक्षेप नोंदवू शकेल. सदर आक्षेप संस्था / शिक्षण संचालकांना प्रणालीवर दिसेल. त्यावर शिक्षण संचालक, प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक ७ (सात) दिवसांच्या आत निर्णय घेतील. सात दिवसांच्या आत आक्षेप न नोंदविला गेल्यास निवडसूचीतील पुढील उमेदवाराच्या नियुक्तीची प्रक्रिया नियुक्ती प्राधिकारी करेल.

१६. छाननीअंती मूळ कागदपत्र योग्य असल्याची खात्री झाल्यास निवडसूचीतील उच्चतम गुणप्राप्त उमेदवारांना संबंधित संस्था वर नमूद केल्याप्रमाणे तीन दिवसाच्या कालावधीत e-mail द्वारे तसेच नोंदणीकृत डाकेने नियुक्तीपत्र पाठवेल.

१७. उमेदवाराने नियुक्तीपत्रास विहीत मुदतीत स्वीकृती दिल्यानंतर संबंधित शाळेचा मुख्याध्यापक त्या उमेदवारास शिक्षण सेवक म्हणून "पवित्र" संगणकीय कार्यप्रणालीद्वारे ऑनलाईन रुजू करुन घेतील व त्याचा रुजू अहवाल भरतील. (uploading of Joining Report) त्यामुळे सदर शिक्षण सेवकाची माहिती सरल संगणक प्रणालीवर आपोआप अद्ययावत होईल व शालार्थ प्रणालीसाठीही उपलब्ध राहील. निवड झालेल्या उमदेवारास संस्थेने रुजू करुन घेतले नाही तर, अशा संस्थेच्या शाळेतील संबंधित पद व्यपगत करण्यात येईल.

१८. शिक्षण सेवकाची नियुक्ती केल्यानंतर संबंधित शिक्षण सेवकाच्या सेवापुस्तकात नोंद घेण्यात यावी.

१९. उमेदवार शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता, वय, जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र इतर सर्व प्रमाणपत्र याबाबत अपात्र असल्यास, संबंधित उमेदवाराची या परीक्षेसाठीची अर्हता संपुष्टात येईल. मात्र, आवश्यक अर्हतेच्या पूर्ततेअंती याच किंवा सुधारित गुणाच्या आधारावर अर्ज करण्यास उमेदवार पात्र असेल.

२०. "पवित्र" प्रणालीद्वारे करावयाच्या शिक्षण सेवक / शिक्षक भरतीसाठी प्राथमिक शाळांच्या बाबतीत शिक्षण संचालक (प्राथमिक) तसेच माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांच्या बाबतीत शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) हे "नोडल अधिकारी" म्हणून काम पाहतील.

२१. शिक्षक भरतीसंबंधी येणाऱ्या सर्व अडचणीचे निराकरण संबंधित "नोडल अधिकारी" यांनी आवश्यकतेनुसार शासनाच्या सहमतीने करावे.

२२. या शासन निर्णयानंतर करण्यात येणाऱ्या शिक्षण सेवक नियुक्तीकरिता वैयक्तिक मान्यता तसेच ना-हरकत प्रमाणपत्राची गरज राहणार नसल्यामुळे संदर्भ क्र. ४ ते ७ शासन निर्णयात वैयक्तिक मान्यता तसेच ना-हरकत प्रमाणपत्रासंदर्भात करण्यात आलेल्या तरतूदी या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०६२०१८४६३६९१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vandana Krishna
Date: 2018.06.20 18:49:20 +05'30'

**( वन्दना कृष्णा )**
**अप्पर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
५) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
६) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
७) मा. विधान परिषद / विधान सभा सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
९) मा. अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई.
१०) प्रधान सचिव, (सर्व) मंत्रालय, मुंबई.
११) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) आयुक्त, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, पुणे.
१३) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
१६) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
१७) विभागीय आयुक्त (महसूल विभाग) (सर्व)
१८) सर्व जिल्हाधिकारी.
१९) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
२०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२१) मुख्य कार्यकारी अधिकारी, नगर पालिका / नगर परिषद (सर्व)
२२) सर्व विभागीय उपसंचालक.
२३) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई.
२४) सर्व सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद.
२५) निवड नस्ती (टिएनटी-१).

( शासन निर्णय क्र. सीईटी-२०१५/प्र.क्र.१४९/टिएनटी-१, दिनांक २० जून, २०१८ )

## परिशिष्ट - अ

### १) स्वतंत्र Log in (User name, Password) ID द्यावयाचे प्राधिकारी

| खाजगी शैक्षणिक संस्था | जिल्हा परिषद | महानगर पालिका / नगर पालिका/ नगर परिषद |
|---|---|---|
| शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक) | मुख्य कार्यकारी अधिकारी | आयुक्त (महानगर पालिका)/ मुख्य अधिकारी (नगर पालिका/ नगर परिषद) |
| शिक्षण उपसंचालक | -- | शिक्षण उपसंचालक |
| शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) | शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) | प्रशासन अधिकारी / शिक्षणाधिकारी |

### २) बिंदूनामावली भरणारे व तपासणारे प्राधिकारी

| अ.क्र. | संस्था | बिंदूनामावली भरणारे प्राधिकारी | तपासणारे प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १. | खाजगी प्राथमिक / माध्यमिक शैक्षणिक संस्था | अध्यक्ष / सचिव संबंधित संस्था | शिक्षण निरीक्षक / शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक ) |
| २. | खाजगी उच्च माध्यमिक शैक्षणिक संस्था | अध्यक्ष / सचिव संबंधित संस्था | शिक्षण निरीक्षक / शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक ) |
| ३. | जिल्हा परिषद | शिक्षणाधिकारी (प्राथमिक ) | मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद |
| ४. | महानगरपालिका | प्रशासन अधिकारी / शिक्षणाधिकारी | आयुक्त (महानगरपालिका) |
| ५. | नगर पालिका / नगर परिषद / कटक मंडळे | प्रशासन अधिकारी | विभागीय शिक्षण उपसंचालक |